अध्ययन रजा मंजूरीबाबत.
श्री.बाळासाहेब रंगनाथ मोरे,
अधिव्याख्याता,विद्युत अभियांत्रिकी,
शासकिय तंत्रनिकेतन, नांदेड

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांकः रजामं-३३१५/प्र.क्र.२७४/१५/तांशि-७
४ था मजला, मंत्रालय विस्तार,
हुतात्मा राज गुरू चैाक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०४ नोव्हेंबर, २०१५

वाचा :

१) संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे क्र.४अ/ आस्था/अध्य.रजा-मोरे/ २०१५/६१९, दि.०९ सप्टेंबर,२०१५ चे पत्र.

प्रस्तावना:-

श्री.बाळासाहेब रंगनाथ मोरे, अधिव्याख्याता, विद्युत अभियांत्रिकी, शासकीय तंत्रनिकेतन, नांदेड यांची स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड अंतर्गत एस.जी.जी.एस. इन्स्टिट्युट ऑफ इंजिनिअरिंग ॲन्ड टेक्नॉलॉजी, नांदेड येथे पीएच.डी. अभ्यासक्रमासाठी निवड झाली असून सन २०१४-१५ या शैक्षणीक वर्षापासून पीएच.डी. अभ्यासक्रमासाठी श्री.बाळासाहेब रंगनाथ मोरे, यांना महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम क्र.८० व ८१ (१) (ए) (बी) नुसार अध्ययन रजा मंजूर करण्याचा प्रस्ताव संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांनी संदर्भाधिन पत्रान्वये शासनास सादर केला आहे.

**शासन निर्णय:**

श्री.बाळासाहेब रंगनाथ मोरे, अधिव्याख्याता, विद्युत अभियांत्रिकी, शासकीय तंत्रनिकेतन,नांदेड यांची स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड अंतर्गत एस.जी.जी.एस. इन्स्टिट्युट ऑफ इंजिनिअरिंग ॲन्ड टेक्नॉलॉजी, नांदेड येथे पी.एच.डी. अभ्यासक्रमासाठी होणारा खर्च स्वत: करणार आहेत. सदर पी.एच.डी. अभ्यासक्रमासाठी महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम क्र.८० व ८१ (१) (ए) नुसार १२ महिन्याची अध्ययन रजा खालील अटींच्या अधीन राहून या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात येत आहे.

१. श्री.बाळासाहेब रंगनाथ मोरे,अध्ययन रजेवर जाण्यासाठी ज्या दिवशी कार्यमुक्त होतील, त्या दिवसापासून त्यांची सदरची रजा सुरु होईल.
२. श्री.बाळासाहेब रंगनाथ मोरे,यांनी अध्ययन रजेवरुन परत आल्यावर अध्ययन रजेच्या कालावधीत केलेल्या कामाबाबतचा संपूर्ण अहवाल तसेच उत्तीर्ण झालेल्या परीक्षांची प्रमाणपत्रे किंवा विशेष अभ्यासक्रमांची प्रमाणपत्रे अभ्यासक्रम सुरू झाल्याच्या व समाप्त झालेल्या तारखेसह संचालक, तंत्रशिक्षण यांच्याकडे तात्काळ सादर करावीत.

३. श्री.बाळासाहेब रंगनाथ मोरे, यांनी पीएच.डी. अभ्यासक्रम पूर्ण केल्यानंतर, शासनामध्ये किमान ०३ वर्षे शिक्षकीय पदावर सेवा करण्याबाबतचे बंधपत्र महाराष्ट्र नागरी सेवा(रजा) नियम, १९८१ च्या परिशिष्ट-५ मधील नमुना-७ प्रमाणे अध्ययन रजेवर जाण्यापूर्वी संचालक, तंत्रशिक्षण यांचेकडे सादर करावे.

४. श्री.बाळासाहेब रंगनाथ मोरे,यांना शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय भारताबाहेर जाता येणार नाही.

२. असे प्रमाणित करण्यात येते की, वरील मुदतीत श्री.बाळासाहेब रंगनाथ मोरे,हे जर रजेवर गेले नसते तर त्यांनी त्यांच्या सध्याच्या अधिव्याख्याता या पदावर स्थानापन्न म्हणून काम केले असते.

३. सदर आदेश शासन निर्णय, वित्त विभाग क्र. सेनिवे-१००१/१३०/सेवा-४, दि. ०२ जून २००३ मधील तरतुदीनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५११०४१६१९५८३१०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Jaya Shetty

Digitally signed by Sudhir Jaya Shetty
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, serialNumber=e9d37d499a521b728aeb3dc8ec38b759420308b9fd7816002b4af0ffbf1111d7, cn=Sudhir Jaya Shetty
Date: 2015.11.04 16:24:34 +05'30'

**(सुधीर जया शेट्टी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) सहसंचालक, तंत्रशिक्षण, विभागीय कार्यालय, औरंगाबाद
३) प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, नांदेड
४) कुल सचिव ,स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड
५) प्राचार्य ,एस.जी.जी.एस. इन्स्टिट्युट ऑफ इंजिनिअरिंग ॲन्ड टेक्नॉलॉजी, नांदेड
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
७) जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड
८) श्री.बाळासाहेब रंगनाथ मोरे, अधिव्याख्याता, विद्युत अभियांत्रिकी, शासकीय तंत्रनिकेतन,नांदेड (मार्फत प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन,नांदेड).
९) निवड नस्ती/तांशि-७